**राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात क्षेत्रविकास कार्यक्रम राबविण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०११/प्र.क्र.९१/का.७
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : ३१ डिसेंबर, २०११.**

**संदर्भ** :- १) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, समक्रमांक, दि. १३ जून, २०११.
२) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, समक्रमांक, दि. १९ सप्टेंबर,२०११.
३) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. क्षेविका-२०११/प्र.क्र. १०१/का-७, दि. ३० सप्टेंबर,२०११.
४) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, समक्रमांक, दि. १७ ऑक्टोबर,२०११.
५) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, समक्रमांक, दि. ३१ ऑक्टोबर,२०११.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला असून संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये ही योजना सन २०११-१२ या वर्षात देखील राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे. या योजनेंतर्गत संदर्भ क्र. २, ३, ४ आणि ५ येथील शासन निर्णयान्वये एकंदर ६२ महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतींना अनुदान मंजूर करण्यात आले असून हे अनुदान संबंधित जिल्हाधिकारी यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. संदर्भ क्र. २, ४ व ५ येथील शासन निर्णयान्वये ज्या महानगरपालिका/नगरपालिकांना छाननीअंती अनुदान मंजुर करण्यात आले आहे, त्या महानगरपालिका/नगरपालिका वगळता शासनास आत्तापर्यंत प्राप्त झालेल्या उर्वरित महानगरपालिका /नगरपालिका यांच्या प्रस्तावांची छाननी करण्यात आली. छाननीअंती विहित निकषांनुसार अनुदान मिळण्यास पात्र असलेल्या महानगरपालिका / नगरपालिकांना या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत अनुदान मंजुर करण्यात येत असून हे अनुदान संबंधित महानगरपालिका / नगरपालिका ज्या जिल्हयांमध्ये स्थित आहेत, त्या जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे.

३. संबंधित महानगरपालिका /नगरपालिकांना मंजुर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

४.	राज्यातील महानगरपालिका /नगरपालिकांनी मागणी केल्यानुसार ज्या विवक्षित प्रयोजनासाठी निधि मंजुर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित महानगरपालिका / नगरपालिकांनी निधि खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित महानगरपालिका / नगरपालिकांनी सहा महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोजिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या परिशिष्ट "ब" मध्ये विहित केलेल्या नमुन्यात अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील महानगरपालिका / नगरपालिकांनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा. संबंधित जिल्हाधिकारी यांना असेही सूचित करण्यात येते की, त्यांच्या जिल्हयात स्थित असलेल्या ज्या महानगरपालिका / नगरपालिका यांना सन २०१०-११ या आर्थिक वर्षात क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत अनुदान मंजुर करण्यात आले होते, अशा महानगरपालिका /नगरपालिकांकडून निधिच्या विनियोगाबाबतची उपयोजिता प्रमाणपत्रे कोणत्याही परिस्थितीत या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एका महिन्याच्या आत प्राप्त करुन घेऊन शासनास सादर करावीत.

६.	या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१ ए, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक सर्केंद्रित क्षेत्रातील क्षेत्र विकास कार्यक्रमाकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या वर्षाकरिता मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७.	हे आदेश वित्त विभागाने त्यांच्या शासन परिपत्रक क्र. अंदाज-२०११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दि. २१/९/२०११ अन्वये दिलेल्या सूचना व त्याअनुषंगाने देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

८.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.maharashtra. gov.in) उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१११२३१०९२९५६१२५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सं.का. गंब्रे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
संबंधित जिल्हाधिकारी,
आयुक्त, संबंधित महानगरपालिका,
मुख्याधिकारी, संबंधित नगरपालिका,
सर्व मंत्रालयीन विभाग,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
निवडनस्ती.

**शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि-२०११/प्र.क्र.९१/का.७, दि. ३१/१२/२०११**

**परिशिष्ट - "अ"**

**महाराष्ट्र राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्र विकास कार्यक्रम**

**महानगरपालिका/नगरपालिकांचे जिल्हानिहाय निधी वितरणाचे विवरणपत्र.**

(रु. लाखांत)

| अ. क्र. | जिल्हा | महानगरपालिका/नगरपालिकेचे नाव | | उद्देश | निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | १ | कल्याण-डोंबिवली महानगरपालिका | १. मुल्ला मंजील ते आर.क्र.प्लाझा ते अन्सारी पोलिस चौकी पर्यंत नविन गटार व स्लॉब बनविणे व पंजत वाडी गटार व पायवाटा बांधणे.<br>२. प्रभाग क्र. ३९ खिश्चन मशान भुमितील कंपाऊंड वॉल दुरुस्त करणे व अंतर्गत पायवाटा व किरकोळ दुरुस्ती करणे. | १९. ९९ |
| | | २ | उल्हासनगर महानगरपालिका | १. प्रभाग क्र. ५ मधील गुलशन नगर मुस्लिम वस्तीमध्ये शौचालय बांधणे.<br>२. प्रभाग क्र. ६ बाळकृष्ण नगर निजाम भगवान निवास मुस्लीम वस्तीत सी.सी.फेवर ब्लॉक बसवणे.<br>३. प्रभाग क्र. ४३ मध्ये पेव्हमेंट रोड नाली बसवणे.<br>४. प्रभाग क्र. ३० एकता कॉलनी पेव्हमेंठ रोड नाली बसवणे.<br>५. प्रभाग क्र. १० येथील मीनताई ठाकरे नगर सी. सी.पॅसेज पेव्हर ब्लॉक व नाली बनवणे.<br>६. प्रभाग क्र. २८ भाऊजी नगर, पंचेसील नगर, सी. सी. पॅसेज पेव्हर ब्लॉक व नाली बनवणे.<br>७. प्रभाग क्र. ७ सी. सी.पॅसेज पेव्हर ब्लॉक व नाली बनवणे.<br>८. प्रभाग क्र. ६८ फुले नगर, पटेल नगरमध्ये सी.सी.पॅसेज पेव्हर ब्लॉक व नाली बनवणे. | २०. ०० |
| २ | वर्धा | १ | वर्धा नगरपालिका अ वर्ग | वर्धा नगरपरिषदेने कब्रस्थानला जाणा-या रस्त्यावरील पुलाचे बांधकाम करणे. | १५. ०० |
| | | २ | हिंगणघाट नगरपालिका ब वर्ग | निशानपुरा वार्ड मधील कब्रस्थानचे पश्चिमेकडील तथा उत्तरेकडील उर्वरित कुंपन भिंत बांधकाम करणे. | १०. ०० |
| | | ३ | देवळी नगरपालिका क वर्ग | वार्ड क्र. ८ मध्ये देवळी येथील हजरत दिनाशाहवली दर्गा मज्जीद मध्ये संडास, बाथरुम, मुतारीचे व अंतर्गत सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणेबाबत. | १०. ०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | ४ | सिंदी नगरपालिका क वर्ग | मस्तानशहा रोड ते कब्रस्थानपर्यंत सिमेंट कॉंक्रीट रस्ता बांधकाम | १०. ०० |
| ३ | अमरावती | १ | अमरावती महानगरपालिका | १. प्रभाग क्र. २७ लालखडी रोड येथील कब्रस्थानला कपाऊंड वाल बांधणे. | २०. ०० |
| ४ | बीड | १ | गेवराई नगरपालिका क वर्ग | १. संजय नगर दारलुम येथे सिमेंट कॉक्रीट रोड करणे.<br>२. मुस्लीम कब्रस्तान येथे शेड बांधकाम करणे.<br>३. कब्रस्तान मोमीनपुरा येथे सिमेंट कॉक्रीट रोड करणे. | ९. ४३ |
| ५ | सिंधुदूर्ग | १ | मालवण नगरपालिका क वर्ग | १. मेढा मालवण येथील मुस्लीम कब्रस्थान येथे सोयी सुविधा पुरविण.<br>२. रोझरी चर्च ख्रिश्चन दफन भूमीकडे जाणारा रस्ता डांबरीकरण करणे. | १०. ०० |
| ६ | नाशिक | १ | सिन्नर नगरपालिका क वर्ग | १. काझीपुरा भागात कॉक्रीट गटार बांधकाम करणे.<br>२. गणीभाई शेख घर ते राजेंद्र वंजारी दुकानापर्यंत रस्ता डांबरीकरण करणे.<br>३. काझीपुरा भागात हायमास्ट बसविणे. | ९. ९९ |
| | | २ | इगतपुरी नगरपालिका क वर्ग | नगरपरिषद हद्दितील जुना गावठा येथील मुस्लीम कब्रस्तानात रस्ता व बसण्याची व्यवस्था व इतर कामे करणे. | ८. ९५ |
| ७ | रायगड | १ | मुरुड-जंजिरा नगरपालिका क वर्ग | १. अब्दुल रज्जाक ते शारीक उघडे रस्ता कॉंक्रीटकरण करणे.<br>२. नागोठणेकर ते महमंद शेख कर्बिगचे बांधकाम करणे<br>३. मोहीददीन शेख ते नागोठणेकर कर्बिगचे बांधकाम करणे. | ९. ४४ |
| | | २ | रोहा नगरपालिका क वर्ग | रोहा वरचा मोहल्ला कब्रस्थान कंपाऊंड वॉल बांधणे. | १०. ०० |
| ८ | परभणी | १ | जिंतूर नगरपालिका क वर्ग | १. जिंतूर वार्ड क्र. ५ मधील अंगणवाडी बांधकाम.<br>२. जिंतूर वार्ड क्र. ३ मधील मशाय कब्रस्तानला संरक्षण भिंत बांधणे. | १०. ०० |
| ९ | हिंगोली | १ | कळमनुरी नगरपालिका क वर्ग | १. नाईकवाडी मोहल्ला येथील कब्रस्थान भोवती सुरक्षा भिंतीचे बांधकाम.<br>२. जैन समाजाच्या स्मशान भुमीसाठी क्रिमीशन शेडचे बांधकाम | ९. ३८ |
| | | **एकूण** | | **(Grand Total) एकूण**<br>**( एक कोटी ब्याऐंशी लाख अठरा हजार मात्र)** | **१८२. १८** |

**शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि-२०११/प्र.क्र.९१/का.७, दि. ३१/१२/२०११**

**परिशिष्ट - "ब"**

## उपयोजिता प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांसाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०११/प्र.क्र. ९१/का-७, दि. अन्वये वितरित केलेला रु. (अक्षरी रु. ) एवढा निधि पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे.

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ | |
| ब | |
| क | |
| ड | |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधि मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे.

तपासणी केलेल्या दस्तऐवज/अभिलेखांचे प्रकार

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)

२. मोजणी पुस्तके (Measurement Books)

३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)

४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका यांची स्वाक्षरी | संबंधित महानगरपालिका / नगरपालिका ज्या जिल्हयात स्थित आहेत त्या जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |